**चंद्रपूर वन प्रबोधनी, चंद्रपूर संकूल निर्मितीसाठी**
**<u>निधी वितरीत करण्याबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. वनबां-२०१६/प्र.क्र. ६९/फ-९**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ३० मार्च, २०१७

<u>वाचा</u> :- १) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्र. कक्ष २४(३)/वअ/७१२/२०१६-१७, दिनांक ८.११.२०१६ चे पत्र.
२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक वनबा-२०१६/प्र.क्र.६९/फ-९, दिनांक २७.३.२०१६.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्र. कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.२६(१६-१७)/२४९३, दि. २९.३.२०१७ चे पत्र.

**<u>प्रस्तावना :-</u>**

वार्षिक योजना सन २०१६-१७ राज्य योजनेअंतर्गत वनातील इमारती / प्रशासकीय इमारतीचे बांधकाम (४४१५ ०१८१) या योजनेतंर्गत रू. ५००.०० लक्ष निधी मंजूर व अर्थसंकल्पीत आहे. तसेच, डिसेंबर, २०१६ च्या अधिवेशनामध्ये सदर योजनेकरीता, वार्षिक योजना सन २०१६-१७ राज्य योजनेअंतर्गत कृषिविषयक संशोधन व शिक्षण यावरील भांडवली खर्च (४४१५ ०१८१) या योजनेतंर्गत रू. २५००.०० लक्ष अतिरिक्त निधी मंजूर व अर्थसंकल्पीत आहे. या संदर्भात वित्त विभागाने दिनांक ८.२.२०१७ चे परिपत्रक निर्गमित केलेले आहे.

वार्षिक योजना सन २०१६-१७ राज्य योजनेअंतर्गत योजनेअंतर्गत चंद्रपूर वन प्रशासन, विकास व व्यवस्थापन प्रबोधनी, चंद्रपूर संकुलातील नवीन इमारतीचे बांधकाम व पायाभूत सुविधा निर्मिती अवस्था-१ करीता रू.२६२५.५१ लक्ष वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

वार्षिक योजना सन २०१६-१७ राज्य योजनेअंतर्गत योजनेअंतर्गत चंद्रपूर वन प्रशासन, विकास व व्यवस्थापन प्रबोधनी, चंद्रपूर संकुलातील नवीन इमारतीचे बांधकाम व पायाभूत सुविधा निर्मिती अवस्था-१ करीता रू. २६२५.५१ लक्ष इतका निधी (४४१५ ०१८१) या लेखाशिर्षाअंतर्गत विहीत केलेल्या अटी व शर्तीस अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१. सदर तरतूद खर्च करतांना वित्त विभागाने वेळो वेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे. वन (संवर्धन) अधिनियम १९८० अंतर्गतच्या तरतूदीचा भंग होणार नाही, याची दक्षता घ्यावी.
२. प्रत्यक्ष खर्च करण्यापूर्वी विहीत पध्दतीचे पालन करावे व आवश्यकतेनुसार आहरण करावे.
३. सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक २०.४.२०१६ च्या परिपत्रकातील व त्यासोबतच्या परिशिष्टामध्ये नमूद केलेल्या अटीची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

४. सदर मंजूरीस शासन निर्णय क्रमांक एमएससी- २०११/प्र.क्र. १७८/फ-५, दिनांक ३०.९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.

उपरोक्त खर्च मागणी क्रमांक सी-१०, प्रधान शिर्ष ४४१५, कृषी विषयक संशोधन व शिक्षण यावरील भांडवली खर्च, ०६ वनीकरण, २७७ शिक्षण, (००) (०६) वन अकादमी चंद्रपूर (४४१५ ०१८१) या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ करिता उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक १७.०४.२०१५ च्या परिपत्रकान्वये तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३११२४४२०८४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash Kashinath Mahajan

Digitally signed by Prakash Kashinath Mahajan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prakash Kashinath Mahajan
Date: 2017.03.31 12:45:52 +05'30'

**( प्रकाश महाजन )**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रत :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण,), महाराष्ट्र राज्य, पुणे
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण), पुणे
५. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), चंद्रपूर.
६. संचालक, चंद्रपूर वन अकादमी, चंद्रपूर.
७. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
८. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारत-१), मंत्रालय, मुंबई-३२.
९. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
११. फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१२. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती).